सन २०२४-२०२५ या आर्थिक वर्षातील
अर्थसंकल्पीय अनुदाने ११ पंचायतराज प्रशिक्षण केंद्र
यांना अनुदानाचे वितरण.

मुख्य लेखाशिर्ष-२०५३०५७४. पहिला हप्ता (वेतन)

महाराष्ट्र शासन
ग्राम विकास विभाग
शासन निर्णय क्रमांकः अनुपं-२०२४/प्र.क्र.५०/आस्था-१५
बांधकाम भवन, २५, मर्झबान पथ,
फोर्ट, मुंबई- ४०० ००१
दिनांक : ३० एप्रिल, २०२४.

वाचा -

१. शा.नि.क्र. ग्राम विकास व जलसंधारण विभाग-प्रशिक्षण-२०९३/प्र.क्र.८४५/०९, दि. १७.०९.१९९३
२. शा.परिपत्रक क्र.ग्राम विकास व जलसंधारण विभाग-प्रशिक्षण ११९९/प्र.क्र.५८१/६१, दि.२३.९.१९९८.
३. शा.परिपत्रक क्र.ग्राम विकास व जलसंधारण विभाग-प्रशिक्षण-२०००/प्र.क्र.८५९/४४, दि.१२.६.२००१.

प्रस्तावना -

सन २०२३-२४ या आर्थिक वर्षाकरिता मागणी क्र. एल-२, "२०५३, जिल्हा प्रशासन-०९३ जिल्हा आस्थापना (०६) (०१) पंच, सरपंच, सचिव, अशासकीय सदस्य इत्यादींना प्रशिक्षण- राज्यक्षेत्र (अनिवार्य), ३१- सहायक अनुदान (वेतनेतर), ३६-सहायक अनुदान (वेतन) (सांकेतांक क्र. २०५३०५७४) अंतर्गत ११ पंचायत राज प्रशिक्षण केंद्रे यांना वेतनेतरसाठी रु. ३६४३.०० हजार (रुपये छत्तीस लक्ष त्रेचाळीस हजार फक्त) व वेतनासाठी रु. ४२८७०.०० हजार (रुपये चार कोटी अठ्ठावीस लक्ष सत्तर हजार फक्त) असे एकूण रु.४६५१३.०० हजार (रुपये चार कोटी पासष्ठ लक्ष तेरा हजार फक्त) इतकी तरतुद अर्थसंकल्पित करण्यात आली आहे. सदर अर्थसंकल्पित अनुदानापैकी पहिला हप्ता वितरित करण्याची बाब शासनाच्या विचाराधीन होती.

शासन निर्णय -

सन २०२४-२५ या वित्तीय वर्षाकरीता अर्थसंकल्पिय तरतुदीच्या मर्यादेत कार्यासन वित्त-१ यांनी ३६, सहायक अनुदाने (वेतन) या उद्दीष्टाकरिता बिम्स प्रणालीवर निधी उपलब्ध करुन दिलेला आहे. त्यानुसार ११ पंचायत राज प्रशिक्षण केंद्र यांना ३६ - सहायक अनुदाने (वेतन) या उद्दीष्टाकरिता रु.१२२५७.२६४ (रुपये एक कोटी बावीस लक्ष सत्तावन्न हजार दोनशे चौसष्ठ फक्त) इतका निधी पहिला हप्ता म्हणून वितरित करण्यास शासन मान्यता देत आहे.

२. प्रशिक्षण केंद्राना अनुदान द्यावयाच्या कार्यपध्दतीबाबत शासन परिपत्रक क्रमांक प्रशिक्षण-११९८/प्र.क्र.५८१/६१ दि.२३ सप्टेंबर, १९९८ व शासन परिपत्रक, ग्राम विकास व जलसंधारण विभाग क्रमांक प्रशिक्षण २०००/प्र.क्र.८५९/४४, दि.१२ जून २००१ अन्वये निर्गमित करण्यात आलेल्या सूचनांच्या अनुंषगाने सर्व संबंधित उपायुक्त (आस्था) यांनी सदर पंचायत राज प्रशिक्षण केंद्रास दरमहा अनुदान अदा करण्याबाबत त्वरीत कार्यवाही करावी. तसेच संदर्भ क्र.१ मध्ये दर्शविलेल्या शासन निर्णयातील परिच्छेद क्रमांक १२ मधील अटीनुसार केंद्रानी खर्च करावा.

३. सदर निधी वितरणाकरिता तसेच निधी ज्या बाबींकरीता मंजूर करण्यात आला आहे, त्याच बाबींवर खर्च करण्यात येईल याची काटेकोर अंमलबजावणी करण्याची जबाबदारी संबंधित उपायुक्त (आस्था), विभागीय आयुक्त कार्यालय यांची असेल. तसेच सदर निधीचे उपयोगिता प्रमाणपत्रही तात्काळ सादर करण्याची दक्षता घेण्यात यावी.

४. हा खर्च "मागणी क्र.एल-२, २०५३, जिल्हा प्रशासन-०९३ जिल्हा आस्थापना (०६) (०१) पंच, सरपंच, सचिव, अशासकीय सदस्य इत्यादींना प्रशिक्षण- राज्यक्षेत्र, ३१, सहायक अनुदान (वेतनेतर) व ३६, सहायक अनुदाने (वेतन) (संकेतांक क्र. २०५३ ०५७४)" या लेखाशिर्षाखाली खर्ची टाकून तो या लेखाशीर्षांतर्गत केलेल्या तरतूदीतून भागविण्यात यावा. तसेच सदर खर्च त्याच लेखाशिर्षाखाली खर्च पडतो आहे, याबाबत ताळमेळ घालून खातरजमा करावी व विभागीय आयुक्तांनी दरमहा शासनास कळवावे. सदर लेखाशिर्षाचे आहरण व संवितरण अधिकारी म्हणून संबधित विभागीय आयुक्त कार्यालयातील उपायुक्त (आस्थापना) हे काम पाहतील.

५. विभागीय आयुक्त कार्यालयाने प्रशिक्षण केंद्रास अनुदान वितरीत करताना वेतन/वेतनेतर बाबीवर प्रत्यक्ष किती अनुदानाची आवश्यकता आहे याची खातरजमा करुन त्यांना आवश्यक तेवढी रक्कम उपलब्ध करुन द्यावी. उपरोक्त नमूद केलेल्या अनुदानापेक्षा जास्त अनुदान वितरीत केले जाणार नाही याची दक्षता घ्यावी. तसेच प्रशिक्षण केंद्राने वेतन/वेतनेतरकरिता दरमहा किती अनुदान आवश्यक आहे याची पूर्वसूचना संबंधित आयुक्त कार्यालयास द्यावी. त्याप्रमाणे आयुक्त कार्यालयाने वेतन/वेतनेतर बाबींकरिता अनुदान वितरीत करावे. आवश्यक असलेल्या अनुदानाबाबत पूर्वसूचना न दिल्यास त्याची संपूर्ण जबाबदारी संबंधित केंद्राच्या प्राचार्यांची असेल.

६. या अनुदानातून संबंधित प्रशिक्षण केंद्राने केलेल्या खर्चाचे स्वतंत्र लेखे व पुस्तके तपासण्याचा अधिकार महालेखापाल, (लेखा) महाराष्ट्र-१ मुंबई आणि/किंवा महालेखापाल (लेखा) महाराष्ट्र-२ नागपूर यांना राहील व त्यांना त्यांचे हे काम योग्य तऱ्हेने पार पाडता यावे म्हणून संबंधित प्रशिक्षण केंद्र/संस्था, मदत / सुविधा पुरवतील.

७. हा शासन निर्णय दिनांक १७.०४.२०१५ सोबतच्या वित्तीय अधिकार नियमपुस्तिका १९७८ भाग १ ला, उपविभाग १ ते ५ मधील तरतूदीनुसार अ.क्र. ४ परि. २७ (२) नुसार प्रशासकीय विभागास प्रदान करण्यात आलेल्या वित्तीय अधिकारांचा वापर करून निर्गमित करण्यात येत आहे.

८. सदर शासन निर्णय महाराष्ट्र शासनाच्या www.maharashtra.gov.in या संकेतस्थळावर उपलब्ध करण्यात आला असून त्याचा संगणक सांकेतांक २०२४०४३०१११०१०५७२० असा आहे. हा आदेश डिजीटल स्वाक्षरीने साक्षांकित करुन काढण्यात येत आहे.

**महाराष्ट्राचे राज्यपाल यांच्या आदेशानुसार व नावांने,**

SNEHAL A. ADSUL

Digitally signed by SNEHAL A. ADSUL
DN: cn=SNEHAL A. ADSUL, o=RURAL DEVELOPMENT DEPARTMENT, ou, email=snehal.rohokale@nic.in, c=IN
Date: 2024.04.30 17:48:11 +05'30'

(स्नेहल अडसूळ)
कक्ष अधिकारी, महाराष्ट्र शासन.

प्रत
१. महासंचालक, यशवंतराव चव्हाण विकास प्रशासन प्रबोधिनी, बाणेर रोड, पुणे.
२. विभागीय आयुक्त , सर्व (प्रत्येकी २ प्रती)
३. संचालक राज्य ग्रामीण विकास संस्था (यशदा), बाणेर रोड, पुणे
४. उप आयुक्त (आस्था), विभागीय आयुक्त कार्यालय, कोकण, पुणे, छ.संभाजीनगर, नागपूर, अमरावती व नाशिक.
५. जिल्हा कोषागार अधिकारी, कोकण, पुणे, छ.संभाजीनगर,नागपूर , अमरावती व नाशिक.
६. महालेखापाल, (लेखा परिक्षा/लेखा अनुज्ञेयता) महाराष्ट्र - १, मुंबई.
७. महालेखापाल, (लेखा परिक्षा/लेखा अनुज्ञेयता) महाराष्ट्र - २, नागपूर.
८. वित्त विभाग , कार्यासन क्र. अर्थ-१७/व्यय-१५
९. प्राचार्य, पंचायत राज प्रशिक्षण केंद्र, (सर्व) .
१०. कार्यासन क्र. वित्त-१, वित्त-६, वित्त-७ ग्राम विकास विभाग (२ जादा प्रतींसह)
११.निवड नस्ती का .क्र. आस्था-१५, ग्राम विकास विभाग .

## परिशिष्ट

| शासन निर्णय क्र.अनुपं २०२४/प्र.क्र.५०/आस्था-१५, दि. ३० एप्रिल, २०२४ | | | |
|---|---|---|---|
| सन २०२४-२५ या कालावधीतील पहिल्या हप्त्याचे वितरण (रु.हजारात) | | | |
| अ.क्र. | पंचायत राज प्रशिक्षण केंद्राचे नाव | वेतन | एकुण |
| १ | कोसबाड हिल, जि.पालघर | १९०१.८० | १९०१.८० |
| **अ)** | **विभागीय आयुक्त, कोकण** | **१९०१.८०** | **१९०१.८०** |
| २ | वर्ये, जि.सातारा | ७९५.७५० | ७९५.७५० |
| ३ | गारगोटी, जि.कोल्हापूर | १३५०.००० | १३५०.००० |
| ४ | गौडगांव, जि.सोलापूर | ५९२.००० | ५९२.००० |
| **ब)** | **विभागीय आयुक्त, पुणे** | **२७३७.७५०** | **२७३७.७५०** |
| ५ | मुरुड, जि.लातूर | १०७२.१५० | १०७२.१५० |
| **क)** | **विभागीय आयुक्त, छ.संभाजीनगर** | **१०७२.१५०** | **१०७२.१५०** |
| ६ | हनुमान नगर, जि.नागपूर | ६००.००० | ६००.००० |
| ७ | मूल, जिल्हा चंद्रपूर | २०७०.०० | २०७०.०० |
| **ड)** | **विभागीय आयुक्त, नागपूर** | **२६७०.०००** | **२६७०.०००** |
| ८ | खिरोदा, जि.जळगाव | ६१३.४१४ | ६१३.४१४ |
| **इ)** | **विभागीय आयुक्त, नाशिक** | **६१३.४१४** | **६१३.४१४** |
| ९ | खामगांव, जि.बुलढाणा | ७७३.९०० | ७७३.९०० |
| १० | शिवाजीनगर, जि.अमरावती | १८५८.२५० | १८५८.२५० |
| ११ | पुसद, जि.यवतमाळ | ६३०.००० | ६३०.००० |
| **ई)** | **विभागीय आयुक्त, अमरावती** | **३२६२.१५०** | **३२६२.१५०** |
| | **अ)+ब)+क)+ड)+इ)+ई)** | **१२२५७.२६४** | **१२२५७.२६४** |

SNEHAL A. ADSUL

Digitally signed by SNEHAL A. ADSUL
DN: cn=SNEHAL A. ADSUL, o=RURAL DEVELOPMENT DEPARTMENT, ou, email=snehal.rohokale@nic.in, c=IN
Date: 2024.04.30 17:48:48 +05'30'

(स्नेहल अडसूळ)
कक्ष अधिकारी, महाराष्ट्र शासन.